उपजिल्हा रुग्णालय, अचलपूर, जि.अमरावती येथील दंतचिकित्सा विभागातील दंत यांत्रिकी,गट-क च्या १ अस्थाई पद पुढे चालू ठेवण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पदआ - २०१६ /प्र.क्र. २४० /आरोग्य-३

१० वा मजला, संकुल इमारत,
गो.ते.रुग्णालय, मुंबई-४०० ००१.
तारीख: २४ ऑक्टोबर,२०१६

वाचा -

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग,क्रमांक -संकिर्ण २०१२/प्र.क्र.१३०/आरोग्य -३, दिनांक- २५.०७.२०१२.**
२) **आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्रमांक- संआसे/कक्ष-३/टे-५/अपदे-३/सन २०१६-१७/२२०९-११/१६,दिनांक-२०.१०.२०१६.**

## शासन निर्णय-

उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयान्वये राज्यात सार्वजनिक आरोग्य विभागाअंतर्गत कार्यरत असलेल्या दंतविभागाचे श्रेणीवर्धन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार विभागाच्या १०० खाटांच्या २४ उपजिल्हा रुग्णालयांकरीता दंत शल्य चिकित्सक,गट-अ (१ पद), दंत यांत्रिकी, गट-क (१ पद), अधिपरिचारीका, गट-क व दंत सहायक, गट-ड (१पद) अशी प्रत्येकी ४ पदे याप्रमाणे एकूण ९६ पदांची निर्मिती करण्यात आलेली आहे. त्यानुसार उपजिल्हा रुग्णालय, अचलपूर, जि.अमरावती येथे दंतयांत्रिकी, गट-क हे १ पद भरण्यात आलेले आलेले आहे.

२. आता या शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक यांच्या अधिपत्याखालील उपजिल्हा रुग्णालय, अचलपूर, जि.अमरावती येथील दंतयांत्रिकी, गट-क या १ पदास ते त्या पदावर कार्यरत झाल्याच्या दिनांकापासून म्हणजे दि.१३.०६.२०१६ ते दि.२८.०२.२०१७ पर्यांत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१६-२०१७ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

**१) मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०६ - सार्वजनिक आरोग्य
००१ - संचालन व प्रशासन
(०१) (०८) - प्राथमिक आरोग्य केंद्राचा दर्जा ग्रा.रु.इतका वाढविणे (२२१० ४६२४)

**२) मागणी क्रमांक-आर-१**

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०३ - ग्रामिण आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
११० - रुग्णालये व दवाखानेसंचालन व प्रशासन
११०- १ इतर रुग्णालये व दवाखाने
(०१)(०१) - कुटीर रुग्णालये (२२१० ०३१५)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्रमांक,पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/विसु-१,दिनांक-२१.०९.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१०२४१५५०१४६७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vivek Rambhaji Dahiphale

Digitally signed by Vivek Rambhaji Dahiphale
DN: CN = Vivek Rambhaji Dahiphale, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Public Health Dept
Date: 2016.10.24 19:30:44 +05'30'

**(विवेक दहिफळे)**
सहसचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) ( लेखा व अनुज्ञेयता), मुंबई नागपूर
२. संचालक,आरोग्य सेवा, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, (वैद्यकीय) मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.

५. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अमरावती.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
८. वैद्यकीय अधिक्षक,उपजिल्हा रुग्णालय, अचलपूर जि.अमरावती.
९. वित्त विभाग (व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/ सेवा-५/अर्थसंकल्प, सा.आ.वि. मंत्रालय,मुंबई.
११. निवडनस्ती (आरोग्य-३)